**राज्यातील निवडक फळपिकावर**
**हवामानावर आधारीत पथदर्शक**
**फळपिक विमा योजना २०११**
**प्रायोगिक तत्वावर राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. विमायो २०१०/प्रक्र १११/१४ अे**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तारभवन, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ४ नोव्हेंबर, २०११.**

**वाचा :** **१) केंद्र शासनाचे कृषि व सहकार विभागाचे पत्र क्र.१३०११/०१/२००८-क्रेडीट-II दिनांक १० मार्च, २०११.**
**२) संचालक, फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.सफ/फलो-१/प्रक्र६०९(का) /१७३४/२०११, दिनांक २ जुलै, २०११ चे पत्र.**
**३) एग्रीकल्चर इंश्योरेंस कंपनी ऑफ इंडिया लि. याचे पत्र क्र.एमआरओ/डब्ल्यूबीसीआयएस-२०११/१६७९/२०११, दिनांक १० ऑक्टोबर,२०११ चे पत्र**

**प्रस्तावना :-**

कृषि क्षेत्राच्या वाढीमध्ये फळपिकाचा प्रमुख सहभाग आहे. फळपिकाचे बाजार मुल्य अधिक असल्यामुळे शेतकऱ्यांना चांगले उत्पन्न मिळते. मात्र फळपिक न आल्यास येणारा तोटाही मोठा असतो सद्यपरिस्थितीत, नारळ फळपिका व्यतिरिक्त कोणत्याही अन्य फळपिकाकरिता फळपिक विमा योजना राबविण्यात येत नाही. फळपिकाच्या उत्पादनावर हवामानाच्या विविध घटकांचा मोठया प्रमाणावर परिणाम होत असल्याने प्रतिकूल हवामान घटकापासून राज्यातील निवडक फळपिकांना विमा योजनेद्वारे संरक्षण देणे गरजेचे झाले आहे. यास्तव राज्यात सन २०११-१२ च्या आर्थिक वर्षात प्रायोगिक तत्वावर हवामानावर आधारित पथदर्शक फळपिकविमा योजनेचा पर्याय राज्यातील निवडक फळपिकांवर पडताळून पहाण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

राज्यातील द्राक्ष, केळी, संत्रा, मोसंबी व डाळींब या फळपिकांसाठी प्रायोगिक तत्वावर हवामानावर आधारित फळपिकविमा योजना सहपत्र -१ मध्ये नमूद केलेल्या तालुक्यामध्ये सहपत्र-२ मध्ये नमूद केल्यानुसार सन २०११-१२ मध्ये लागू करण्यात येईल. संदर्भ हवामान केंद्र सहपत्र -१ मध्ये नमूद केल्यानुसार प्रत्येक तालुक्यातील महसूल मंडळ पातळीवर स्थापन करण्यात येईल व तेथे नोंदल्या गेलेल्या हवामानाच्या तपशिलानुसार सहपत्र -२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे एग्रीकल्चर इंश्योरेंस कंपनी ऑफ इंडिया लि. मार्फत शेतकऱ्यांना बँकांमार्फत नुकसान भरपाई परस्पर देय होईल**.**

**२. योजनेची उद्दिष्टे**

१) पाऊस, तापमान, सापेक्ष आर्द्रता व वेगाचे वारे यांपासून फळपिक योजनेच्या तरतूदीप्रमाणे फळपिकांना निर्धारीत केलेल्या कालावधीत शेतक-यांना विमा संरक्षण आणि आर्थिक सहाय्य देणे.

२) हवामान घटकावर आधारित फळपिक नुकसानीच्या अत्यंत कठीण परिस्थतीत शेतक-यांचे आर्थिक स्थैर्य अबाधित राखणे.

**३.** योजना कार्यान्वित करणारी यंत्रणा, समाविष्ट पिके व समाविष्ट शेतकरी -

अ) सदर फळपिक विमा योजना ॲग्रीकल्चर इंश्युरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड, मुंबई क्षेत्रीय कार्यालय स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, पूर्व खंड, २० वा मजला, दलाल स्ट्रीट, फोर्ट, मुंबई - ४०० ०२३ यांच्यामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

ब) हवामान आधारीत फळपिक विमा योजने अंतर्गत द्राक्ष, केळी, संत्रा, मोसंबी, व डाळींब फळपिकांसाठी विमा संरक्षण देय आहे.

क) सहपत्र-१ मध्ये दर्शविलेले अधिसूचित क्षेत्र व यामधील अधिसूचित फळपीके म्हणजे द्राक्ष, केळी, संत्रा, मोसंबी, व डाळींब पिक घेणारे सर्व शेतकरी या योजनेत भाग घेण्यास पात्र आहेत.

ड) विविध वित्तीय संस्थांक्डे पीक कर्जासाठी अर्ज केलेल्या व ज्याची अधिसूचित फळपिकासाठी पीक कर्ज मर्यादा मंजूर आहे अशा सर्व शेतक-यांना ही योजना सक्तीची राहील.

इ) बिगर कर्जदार शेतक-यांना ही योजना ऐच्छिक राहील.

४. अधिसूचित फळपिके, विमा संरक्षण प्रकार (हवामान धोके), विमा संरक्षण कालावधी, विमा संरक्षित रक्कम, प्रमाणके (ट्रिगर) व नुकसान भरपाई रक्कम सहपत्र-दोन मध्ये नमूद केल्यानुसार राहातील.

**५. अधिसूचित फळपिके यांचा समाविष्ट धोके व विमा संरक्षण कालावधी खालीलप्रमाणे राहील :-**

| फळपीके | समाविष्ट धोके | विमा संरक्षण कालावधी | |
|---|---|---|---|
| १) द्राक्ष | रोगराई पोषक हवामान (अवेळी पाऊस, तापमान,सापेक्ष आर्द्रता) | १ नोव्हेंबर २०११ | ३१ जानेवारी २०१२ |
| २) केळी | कमी तापमान | १ नोव्हेंबर २०११ | २९ फेब्रुवारी २०१२ |
| | वेगाचे वारे | १ मार्च २०१२ | ३१ जुलै २०१२ |
| ३) संत्रा (आंबीया बहार) | अवेळी पाऊस | १ डिसेंबर २०११ | १५ जानेवारी २०१२ |
| | जास्त तापमान | १ मार्च २०१२ | ३१ मे २०१२ |
| ४) मोसंबी (आंबीया बहार) | अवेळी पाऊस | १ नोव्हेंबर २०११ | १५ डिसेंबर २०११ |
| | जास्त पाऊस | १५ ऑगस्ट २०१२ | १५ सप्टेंबर २०१२ |
| | जास्त तापमान | १ मार्च २०१२ | ३१ मार्च २०१२ |
| ५) डाळींब (हस्तबहार) | अवेळी पाऊस | १ नोव्हेंबर २०११ | ३१ मार्च २०१२ |

**६. विमा हप्ता दर**

सर्व अधिसूचित फळ पिकासाठी विमा संरक्षित रकमेच्या १२ टक्के एवढा विमा हप्ता दर निर्धारीत करण्यात आला आहे.

**७. विमा हप्ता अनुदान**

पथदर्शक हवामान आधारीत पीक विमा योजनेमध्ये भाग घेण्या-या सर्व शेतक-यांना विमा हप्त्यापोटी ७५ टक्के अनुदान देय आहे. या अनुदानाच्या रकमेत केंद्र शासनाचा २५ टक्के व राज्य शासनाचा ५० टक्के हिस्सा राहील आणि शेतक-याने स्वत:ची २५ टक्के रक्कम विमा हप्त्यापोटी भरावयाची आहे.

प्रति हेक्टर (रुपये)

| फळपीके | विमा संरक्षित रक्कम | विमा हप्ता | राज्य शासनाचे अनुदान | केंद्र शासनाचे अनुदान | शेतकऱ्यांनी भरावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| द्राक्ष | १५०,००० | १८,००० | ९,००० | ४,५०० | ४,५०० |
| केळी | १००,००० | १२,००० | ६,००० | ३,००० | ३,००० |
| संत्रा(आंबीया बहार) | ६०,००० | ७,२०० | ३,६०० | १,८०० | १,८०० |
| मोसंबी(आंबीयाबहार) | ६०,००० | ७,२०० | ३,६०० | १,८०० | १,८०० |
| डाळींब (हस्त बहार) | ५०,००० | ६,००० | ३,००० | १,५०० | १,५०० |

**८. या योजने बाबतचे फळपिक व त्यांचे हंगामनिहाय वेळापत्रक खालीलप्रमाणे राहील :-**

| **तपशिल** | **फळपीक** | **अंतिम तारीख** | **शेरा** |
|---|---|---|---|
| **(१)** कर्जदार शेतकरी/कर्ज घेतलेले व बँकेकडून अधिसूचित फळ पिकांसाठी पीक कर्ज मर्यादा मंजूर असलेले शेतकरी यांच्या फळपिकांचा विमा करण्याची मुदत. | द्राक्ष, केळी , मोसंबी, डाळींब | -- | ज्या शेतक-यांची अधिसूचित पिकासाठी बँकांकडून ३१ ऑक्टोबर २०११ पर्यन्त कर्जमर्यादा मंजूर असेल त्या सर्व शेतक-यांच्या क्षेत्राचा विमा विहित मुदतीत करुन घेणे बँकांना अनिवार्य आहे. |
| | संत्रा | ३० नोव्हेंबर २०११ | |
| **(२)** बँकांनी कर्जदार शेतक-यांची घोषणा पत्रे (डिक्लेरेशन) कृषि विमा कंपनीस सादर करण्याची मुदत | द्राक्ष, केळी , मोसंबी, डाळींब | ३० नोव्हेंबर २०११ | ---- |
| | संत्रा | ३० डिसेंबर २०११ | |
| **(३)** बिगर कर्जदार शेतक-यांनी विमा प्रस्ताव ( प्रपोजल) बँकांना सादर करण्याची मुदत | द्राक्ष, केळी , मोसंबी, डाळींब | १४ नोव्हेंबर २०११ | ऐच्छिक सहभाग |
| | संत्रा | ३० नोव्हेंबर २०११ | |
| **(४)** बिगर कर्जदार शेतक-यांची घोषणापत्रे (डिक्लेरेशन) बॅकानी कृषि विमा कंपनीस सादर करण्याची मुदत | द्राक्ष, केळी , मोसंबी, डाळींब | ३० नोव्हेंबर २०११ | --- |
| | संत्रा | १५ डिसेंबर २०११ | |
| **(५)** पर्जन्यमान आकडेवारी सादर करणे | दर आठवडयाला दैनंदिन पर्जन्यमान सादर करणे | | नोंदणीकृत संस्थेमार्फत स्वंयंचलित हवामान केंद्र स्थापन करुन आकडेवारी ॲग्रीकल्चर इंश्युरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड घेईल. |
| **(६)** नुकसान भरपाई अदा करणे | विमा कालावधी संपल्यापासून ४५ दिवसांत देय होईल. | | विमा हप्ता अनुदान व पर्जन्यमान आकडेवारी वेळेत मिळण्याच्या अटीचे अधीन राहून ॲग्रीकल्चर इंश्युरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड शेतकऱ्यांना बँका मार्फत परस्पर अदा करेल. |

९. **<u>बँक सेवा शुल्क</u>:-**

कर्जदार व बिगर कर्जदार शेतक-यांकडून जमा केलेल्या विमा हप्त्याच्या ५ टक्के रक्कम भारतीय कृषि विमा कंपनीकडून बँक सेवा शुल्क म्हणून नोडल बँकाना परस्पर देय होईल.

१०. **<u>नुकसान भरपाई ठराविण्याची पध्दतीः-</u>**

नुकसान भरपाई ठरविण्याची पध्दत सहपत्र-३ मध्ये दर्शविल्यानुसार राहील.

११. ॲग्रीकल्चर इंश्युरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड या संस्थेस योजनेत सहभागी होणाऱ्या शेतकऱ्यांना द्यावयाचे अनुदानासाठी राज्य शासनाच्या हिश्यापोटी देय होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पिय तरतुदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी- ३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११० - पीक विमा**
**११० - ( दोन) पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना**
**राज्य योजना (००) (०२) सर्वंकष पीक विमा योजना**
**(२४०१ ०९२२) ३३- अर्थसहाय्य**

१२. या प्रकरणी सहाय्यक संचालक, लेखा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- १ यांना आहरण व संवितरण अधिकारी व संचालक, फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- १ यांना या योजनेचे मुख्य समन्वयक म्हणून घोषित करण्यात येत असून या योजनेबाबत अधिसूचित तालुक्यातील महसूल मंडळ पातळीवर ॲग्रीकल्चर इंश्युरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड मार्फत हवामान केंद्र स्थापन करण्याबाबत तसेच क्षेत्रीय स्तरावर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यास याद्वारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

१३. हवामानावर आधारीत पथदर्शक फळपिक विमा योजनेचा आढावा राज्य स्तरीय पिक विमा समन्वय समितीच्या बैठकीत घेण्यात येऊन नवीन फळपिकांचा अंतर्भाव करणे / योजनेचे पुनर्विलोकन करुन योजना पुढे चालू ठेवणे याबाबतचा निर्णय घेण्यात येईल.

१४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३१०/का.१४३१, दिनांक २.८.२०११ अन्वये व वित्त विभागाच्या मान्यतेने अनौपचारिक संदर्भ क्रमांक १६०/११, व्यय-१ दिनांक ४.८.२०११ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११०२१०३७२३००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

हे.द.भांगले

**( हे.द.भांगले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव

मा. राज्यमंत्री  (कृषि) यांचे खाजगी सचिव.
मा मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (महसूल व वन) महसूल व वन विभाग , मंत्रालय, मुंबई.
सचिव (सहकार) मंत्रालय, मुंबई.
सचिव,कृषि मंत्रालय, भारत सरकार (कृषि व सहकार विभाग) कृषि भवन, नवी दिल्ली.(पत्राने)
सचिव, वित्त मंत्रालय भारत सरकार (वित्त विभाग) (विमा) नवी दिल्ली. (पत्राने)
संचालक, पिक विमा भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली
आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
अध्यक्ष व कार्यकारी संचालक, भारतीय कृषि विमा कंपनी, १३ वा मजला, अंबादीप बिल्डींग, कस्तुरबा गांधी मार्ग, कॅनॉट प्लेस, नवी दिल्ली,
प्रादेशिक व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, २० वा मजला स्टॉक एक्स्चेंज बिल्डींग, मुंबई -२३
संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई - ३२
निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
महाव्यवस्थापक, महाराष्ट्र नागरी बॅंका ९ नगीनदास रोड, मुंबई-२३
महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर , शिवसागर इस्टेट, वरळी, मुंबई
महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
विमा संचालक, म्हाडा इमारत, पहिला मजला, बांद्रा पूर्व, मुंबई
संचालक, माहिती आणि प्रसिध्दी (प्रसिध्दीसाठी ) मंत्रालय, मुंबई
संचालक, फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-
संचालक, फलोत्पादन मृद संधारण, नियोजन, विस्तार व प्रशिक्षण, साखर संचालक, मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व व्यवस्थापक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅंक,
सर्व विभागीय कृषि सह संचालक, महाराष्ट्र राज्य,
उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर, ५४ वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे-५
मुख्य अधिकारी, मध्यवर्ती वित्त संस्था, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅंक , ९  नगीनदास रोड, मुंबई- २३
मुख्य अधिकारी, ग्रामीण नियोजन व पत विभाग, रिझर्व्ह बॅंक ऑफ इंडिया, फोर्ट, मुंबई
व्यवस्थापक, महाराष्ट्र बॅंक १५०१ , शिवाजीनगर, पुणे-५
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
सर्व सहसचिव /उपसचिव /अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय मुंबई -४०० ०३२
प्रधान सचिव ( कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक
उपसचिव, नियोजन विभाग (कार्या.१४३१) / वित्त विभाग (व्यय-१)
निवडनस्ती -१४ अे

## सहपत्र -१

### पथदर्शी हवामानावर आधारीत फळपिक विमा योजना २०११-१२ साठी अधिसूचित फळपिके व तालुके

| अ.क्र. | फळपिक | जिल्हे | अधिसूचित तालुके |
|---|---|---|---|
| १ | द्राक्षे | नाशिक | निफाड, दिंडोरी, नाशिक, चांदवड |
| | | सांगली | तासगांव, मिरज, जत, खानापूर |
| | | सोलापूर | पंढरपूर, बार्शी, दक्षिण सोलापूर , उत्तर सोलापूर |
| | | पुणे | इंदापूर, जुन्नर, बारामती |
| | | अहमदनगर | अहमदनगर, राहता |
| २. | केळी | जळगांव | रावेर ,चोपडा, मुक्ताईनगर, यावल |
| | | बुलढाणा | बुलढाणा |
| | | नांदेड | हदगांव, अर्धापूर, मुदखेड, नांदेड |
| | | हिंगोली | बसमत |
| ३. | संत्रा (आंबीया बहार ) | अकोला | अकोट |
| | | अमरावती | वरुड, अचलपूर, चांदुरबाजार, मोर्शी |
| | | बुलढाणा | संग्रामपूर |
| | | नागपूर | नरखेड, काटोल, कळमेश्वर, सावनेर |
| | | वर्धा | कारंजा, आष्टी, आर्वी |
| | | वाशिम | मनोरा, मंगळूरपीर, रिसोड, मालेगाव |
| | | यवतमाळ | डिग्रज |
| ४. | मोसंबी (आंबीया बहार ) | औरंगाबाद | औरंगाबाद, पैठण, कन्नड, सोयेगाव |
| | | जालना | अंबड, घनसावंगी, जालना, बदनापूर |
| ५. | डाळींब (हस्त बहार) | सांगली | आटपाडी, जत, कवठे महांकाळ |
| | | सोलापूर | सांगोला, पंढरपूर, मंगळवेढा, मोहोळ |
| | | नाशिक | सटाणा, मालेगाव , देवळा |
| | | अहमदनगर | संगमनेर, राहूरी, श्रीरामपूर |
| | | पुणे | इंदापूर, बारामती |

## सहपत्र -२

## प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारीत फळपिक विमा योजना २०११-१२

**जिल्हा : नाशिक, सांगली, सोलापूर, पुणे व अहमदनगर** **पिक : द्राक्ष**

ही योजना नाशिक, सांगली, सोलापूर, पुणे व अहमदनगर या जिल्हयातील सोबतच्या सहपत्र-१ मध्ये नमूद केलेल्या अधिसूचित तालुक्यात लागू करण्यात येईल. संदर्भ हवामान केंद्र अधिसूचित तालुक्यातील महसूल मंडळ पातळीवर स्थापित करण्यात येईल. सदर हवामान केंद्रात नोंदविली जाणारी माहिती ॲग्रीकल्चर इन्शुरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड दर आठवडयाला संचालक (फलोत्पादन) यांना तसेच संकेत स्थळावर उपलब्ध करुन देईल.

या योजनेत १ नोव्हेंबर २०११ ते ३१ जानेवारी २०१२ विमा संरक्षण कालावधीत द्राक्ष पिकावरील रोगराई पोषक हवामान (अवेळी पाऊस, तापमान व सापेक्ष आर्द्रता यामुळे होणाऱ्या संभाव्य पिक नुकसानीस (आर्थिक ) विमा संरक्षण प्रदान करणे.

| विमा संरक्षण प्रकार (हवामान धोके) व विमा संरक्षण कालावधी | प्रमाणके (ट्रिगर ) व नुकसान भरपाई रक्कम ( प्रती हेक्टर रू ) |
|---|---|
| १) अवेळी पाऊस, तापमान व सापेक्ष आर्दता<br>दि.१ नोव्हेंबर, २०११ ते ३१ जानेवारी, २०१२ | सलग २ दिवस प्रति दिन ५ मिमि किंवा जास्त पाऊस, साप्ेक्ष आर्द्रता ८५ टक्के किंवा जास्त व किमान तापमान १० डिग्री सेल्सिअस पेक्षा जास्त राहिल्यास रु.७५,०००/- देय होईल.<br>सलग ३ दिवस प्रति दिन ५ मिमि किंवा जास्त पाऊस, साप्ेक्ष आर्द्रता ८५ टक्के किंवा जास्त व किमान तापमान १० डिग्री सेल्सिअस पेक्षा जास्त राहिल्यास रु.१,५०,०००/- देय होईल.<br>**या विमा संरक्षण प्रकारात कमाल नुकसान भरपाई रु.१,५०,०००/- देय होईल.** |

**विमा योजनेत सहभाग प्रक्रिया :**

**कर्जदार शेतकरी** : अनिवार्य सहभाग, बँकाकडून द्राक्ष पिकासाठी कर्ज मर्यादा मंजूर असणाऱ्या सर्व शेतकऱ्यांचा विमा हा त्या त्या बँकाकडून त्यांना देण्यात येणाऱ्या कर्ज पुरवठा रकमेतून भरला जाईल.

**बिगर कर्जदार शेतकरी** : ऐच्छिक सहभाग, सदर शेतकऱ्यांनी प्रस्ताव पत्रक भरुन रोख विमा हप्त्यासह आपले खाते असणाऱ्या बँक शाखेत विहीत मुदतीत जमा करावे.

| | |
|---|---|
| एकूण विमा संरक्षित रक्कम (प्रति हेक्टर ) | रु.१,५०,०००/- |
| शेतकऱ्यांनी भरावयाचा विमा हप्ता (प्रति हेक्टर) | रु.४,५००/- |

## सहपत्र -२ (पुढे चालू)

## प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारीत फळपिक विमा योजना २०११-१२

**जिल्हा : जळगांव, बुलढाणा, नांदेड व हिंगोली,** **पिक : केळी**

ही योजना जळगांव, बुलढाणा, नांदेड व हिंगोली या जिल्हयातील सोबतच्या सहपत्र-१ मध्ये नमूद केलेल्या अधिसूचित तालुक्यात लागू करण्यात येईल. संदर्भ हवामान केंद्र अधिसूचित तालुक्यातील महसूल मंडळ पातळीवर स्थापित करण्यात येईल. सदर हवामान केंद्रात नोंदविली जाणारी माहिती ॲग्रीकल्चर इन्शुरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड दर आठवडयाला संचालक (फलोत्पादन) यांना तसेच संकेत स्थळावर उपलब्ध करुन देईल.

या योजनेत १ नोव्हेंबर २०११ ते २९ फेब्रुवारी २०१२ विमा संरक्षण कालावधीत कमी तापमानामुळे व १ मार्च २०१२ ते ३१ जुलै २०१२ विमा संरक्षण कालावधीत वेगाच्या वाऱ्यामुळे होणाऱ्या संभाव्य केळी पिक नुकसानीस (आर्थिक ) विमा संरक्षण प्रदान करणे.

| विमा संरक्षण प्रकार (हवामान धोके) व विमा संरक्षण कालावधी | प्रमाणके (ट्रिगर ) व नुकसान भरपाई रक्कम ( प्रती हेक्टर रू ) |
|---|---|
| १) कमी तापमान<br>दि.१ नोव्हेंबर २०११ ते २९ फेब्रुवारी २०१२ | सलग ३ दिवस किमान तापमान ८ डिग्री सेल्सीअस किंवा त्या पेक्षा कमी तापमान राहिल्यास नुकसान भरपाई रु.२५,०००/- देय होईल. |
| २) वेगाचा वारा<br>दि.१ मार्च २०१२ ते ३१ जुलै २०१२ | मार्च, एप्रिल व जुलै महिन्यात ४० कि.मी.प्रती तास व मे व जून महिन्यात ४५ कि.मी.प्रति तास या वेगाने वारे वाहिल्यास रु.७५,०००/- नुकसान भरपाई रक्कम देय होईल. |

**विमा योजनेत सहभाग प्रक्रिया :**

**कर्जदार शेतकरी** : अनिवार्य सहभाग, बँकाकडून केळी पिकासाठी कर्ज मर्यादा मंजूर असणाऱ्या सर्व शेतकऱ्यांचा विमा हा त्या त्या बँकाकडून त्यांना देण्यात येणा-या कर्ज पुरवठा रकमेतून भरला जाईल.

**बिगर कर्जदार शेतकरी** : ऐच्छिक सहभाग, सदर शेतकऱ्यांनी प्रस्ताव पत्रक भरुन रोख विमा हप्त्यासह आपले खाते असणाऱ्या बँक शाखेत विहीत मुदतीत जमा करावे.

| | |
|---|---|
| एकूण विमा संरक्षित रक्कम (प्रति हेक्टर ) | रु.१,००,०००/- |
| शेतकऱ्यांनी भरावयाचा विमा हप्ता (प्रति हेक्टर) | रु.३,०००/- |

## सहपत्र -२ (पुढे चालू)

## प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारीत फळपिक विमा योजना २०११-१२

**जिल्हा : अकोला, अमरावती, बुलढाणा, नागपूर, वर्धा , वाशिम, व यवतमाळ** **पिक : संत्रा(आंबीया बहार )**

ही योजना अकोला, अमरावती, बुलढाणा, नागपूर, वर्धा, वाशिम व यवतमाळ या जिल्हयातील सोबतच्या सहपत्र-१ मध्ये नमूद केलेल्या अधिसूचित तालुक्यात लागू करण्यात येईल. संदर्भ हवामान केंद्र अधिसूचित तालुक्यातील महसूल मंडळ पातळीवर स्थापित करण्यात येईल. सदर हवामान केंद्रात नोंदविली जाणारी माहिती ॲग्रीकल्चर इन्शुरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड दर आठवडयाला संचालक (फलोत्पादन) यांना तसेच संकेत स्थळावर उपलब्ध करुन देईल.

या योजनेत दिनांक १ डिसेंबर २०११ ते १५ जानेवारी २०१२ विमा संरक्षण कालावधीत अवेळी पावसामुळे व दि.१ मार्च, २०१२ ते ३१ मे २०१२ विमा संरक्षण कालावधीत जास्त तापमानामुळे होणाऱ्या संभाव्य संत्रा पिक नुकसानीस (आर्थिक ) विमा संरक्षण प्रदान करणे.

| विमा संरक्षण प्रकार (हवामान धोके) व विमा संरक्षण कालावधी | प्रमाणके (ट्रिगर ) व नुकसान भरपाई रक्कम **( प्रती हेक्टर रू )** |
|---|---|
| १) अवेळी पाऊस ,<br>दि.१डिसेंबर २०११ ते १५ जानेवारी २०१२ | सलग ७ दिवसात ३०मिमि किंवा त्या पेक्षा जास्त पाऊस झाल्यास नुकसान भरपाई रु.२४,०००/- देय होईल. |
| २) जास्त तापमान<br>फेज-१<br>दि.१ मार्च, २०१२ ते ३१ मार्च २०१२ | सलग ३ दिवस ४०.५ डिग्री सेल्सीअस किंवा त्या पेक्षा जास्त तापमान राहिल्यास नुकसान भरपाई रु.२४,०००/- देय होईल. |
| ३) जास्त तापमान<br>फेज-२<br>दि.१ एप्रिल, २०१२ ते ३१ मे २०१२ | वाशिम, अमरावती, बुलढाणा या जिल्हयांसाठी सलग ३ दिवस ४५ डिग्री सेल्सीअस किंवा त्या पेक्षा जास्त तापमान राहिल्यास नुकसान भरपाई रु.१२,०००/- देय होईल.<br>वर्धा, नागपूर, अकोला व यवतमाळ या जिल्हयांसाठी सलग ३ दिवस ४५.५ डिग्री सेल्सीअस किंवा त्या पेक्षा जास्त तापमान राहिल्यास नुकसान भरपाई रु.१२,०००/- देय होईल. |

**विमा योजनेत सहभाग प्रक्रिया :**

**कर्जदार शेतकरी** : अनिवार्य सहभाग, बँकाकडून संत्रा पिकासाठी कर्ज मर्यादा मंजूर असणाऱ्या सर्व शेतकऱ्यांचा विमा हा त्या त्या बँकाकडून त्यांना देण्यात येणा-या कर्ज पुरवठा रकमेतून भरला जाईल.

**बिगर कर्जदार शेतकरी** : ऐच्छिक सहभाग, सदर शेतकऱ्यांनी प्रस्ताव पत्रक भरुन रोख विमा हप्त्यासह आपले खाते असणाऱ्या बँक शाखेत विहीत मुदतीत जमा करावे.

| | |
|---|---|
| एकूण विमा संरक्षित रक्कम (प्रति हेक्टर) | रु.६०,०००/- |
| शेतकऱ्यांनी भरावयाचा विमा हप्ता (प्रति हेक्टर) | रु.१,८००/- |

## सहपत्र -२ (पुढे चालू)
## प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारीत फळपिक विमा योजना २०११-१२

**जिल्हा : औरंगाबाद व जालना** **पिक : मोसंबी (आंबीया बहार )**

ही योजना औरंगाबाद व जालना या जिल्हयातील सोबतच्या सहपत्र-१ मध्ये नमूद केलेल्या अधिसूचित तालुक्यात लागू करण्यात येईल. संदर्भ हवामान केंद्र अधिसूचित तालुक्यातील महसूल मंडळ पातळीवर स्थापित करण्यात येईल. सदर हवामान केंद्रात नोंदविली जाणारी माहिती ॲग्रीकल्चर इन्शुरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड दर आठवडयाला संचालक (फलोत्पादन) यांना तसेच संकेत स्थळावर उपलब्ध करुन देईल.

या योजनेत १ नोव्हेंबर २०११ ते १५ डिसेंबर २०११ विमा संरक्षण कालावधीत अवेळी पावसामुळे व दि.१ मार्च, २०१२ ते ३१ मार्च २०१२ या विमा संरक्षण कालावधीत जास्त तापमानामुळे तसेच १५ ऑगस्ट २०१२ ते १५ सप्टेंबर २०१२ विमा संरक्षण कालावधीत जास्त पावसामुळे होणाऱ्या संभाव्य मोसंबी पिक नुकसानीस (आर्थिक ) विमा संरक्षण प्रदान करणे.

| विमा संरक्षण प्रकार (हवामान धोके) व विमा संरक्षण कालावधी | प्रमाणके (ट्रिगर ) व नुकसान भरपाई रक्कम ( प्रती हेक्टर रू ) |
|---|---|
| १) अवेळी पाऊस ,<br>१ नोव्हेंबर २०११ ते १५ डिसेंबर २०११ | सलग ४ दिवसात ३० मिमि किंवा त्या पेक्षा जास्त पाऊस झाल्यास नुकसान भरपाई रु.१०,०००/- देय होईल.<br>सलग ५ दिवसात ३५ मिमि किंवा त्या पेक्षा जास्त पाऊस झाल्यास नुकसान भरपाई रु.१६,०००/- देय होईल.<br>सलग ६ दिवसात ४० मिमि किंवा त्या पेक्षा जास्त पाऊस झाल्यास नुकसान भरपाई रु.२०,०००/- देय होईल.<br>**कमाल नुकसान भरपाई रु.२०,०००/- देय होईल** |
| २) जास्त तापमान<br>दि.१ मार्च, २०१२ ते ३१ मार्च २०१२ | सलग ३ दिवस ३९ डिग्री सेल्सीअस किंवा त्या पेक्षा जास्त तापमान राहिल्यास नुकसान भरपाई रु.४०००/- प्रतिदिन खालीलप्रमाणे रक्कम देय होईल.<br>तिसऱ्या दिवशी रु.४,०००/-<br>चौथ्या दिवशी रु.८,०००/-<br>पाचव्या दिवशी रु.१२,०००/-<br>सहाव्या दिवशी रु.१६,०००/-<br>सातव्या दिवशी रु.२०,०००/-<br>**कमाल नुकसान भरपाई रु.२०,०००/- देय होईल** |
| ३) जास्त पाऊस<br>१५ ऑगस्ट २०१२ ते १५ सप्टेंबर २०१२ | सलग ७ दिवसात १७५ मिमि किंवा त्या पेक्षा जास्त पाऊस झाल्यास नुकसान भरपाई रु.७,५००/- देय होईल.<br>सलग ७ दिवसात २२५ मिमि किंवा त्या पेक्षा जास्त पाऊस झाल्यास नुकसान भरपाई रु.१२,५००/- देय होईल.<br>सलग ७ दिवसात २७५ मिमि किंवा त्या पेक्षा जास्त पाऊस झाल्यास नुकसान भरपाई रु.२०,०००/- देय होईल.<br>**कमाल नुकसान भरपाई रु.२०,०००/- देय होईल** |

**विमा योजनेत सहभाग प्रक्रिया :**

**कर्जदार शेतकरी** : अनिवार्य सहभाग, बँकाकडून मोसंबी पिकासाठी कर्ज मर्यादा मंजूर असणाऱ्या सर्व शेतकऱ्यांचा विमा हा त्या त्या बँकाकडून त्यांना देण्यात येणा-या कर्ज पुरवठा रकमेतून भरला जाईल.

**बिगर कर्जदार शेतकरी** : ऐच्छिक सहभाग, सदर शेतकऱ्यांनी प्रस्ताव पत्रक भरुन रोख विमा हप्त्यासह आपले खाते असणाऱ्या बँक शाखेत विहीत मुदतीत जमा करावे.

| | |
|---|---|
| एकूण विमा संरक्षित रक्कम (प्रति हेक्टर ) | रु.६०,०००/- |
| शेतकऱ्यांनी भरावयाचा विमा हप्ता (प्रति हेक्टर) | रु.१,८००/- |

## सहपत्र -२ (पुढे चालू)

## प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारीत फळपिक विमा योजना २०११-१२

**जिल्हा : सांगली, सोलापूर,नाशिक, अहमदनगर व पुणे          पिक : डाळींब (हस्त बहार )**

ही योजना सांगली, सोलापूर,नाशिक, अहमदनगर व पुणे या जिल्हयातील सोबतच्या सहपत्र-१ मध्ये नमूद केलेल्या अधिसूचित तालुक्यात लागू करण्यात येईल. संदर्भ हवामान केंद्र अधिसूचित तालुक्यातील महसूल मंडळ पातळीवर स्थापित करण्यात येईल. सदर हवामान केंद्रात नोंदविली जाणारी माहिती अॅग्रीकल्चर इन्शुरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड दर आठवडयाला संचालक (फलोत्पादन) यांना तसेच संकेत स्थळावर उपलब्ध करुन देईल.

या योजनेत १ नोव्हेंबर २०११ ते ३१ मार्च २०१२ विमा संरक्षण कालावधीत अवेळी पावसामुळे होणाऱ्या संभाव्य डाळींब पिक नुकसानीस (आर्थिक ) विमा संरक्षण प्रदान करणे.

| विमा संरक्षण प्रकार (हवामान धोके) व विमा संरक्षण कालावधी | प्रमाणके (ट्रिगर ) व नुकसान भरपाई रक्कम ( प्रती हेक्टर रू ) |
|---|---|
| अवेळी पाऊस ,<br>दि.१ नोव्हेंबर, २०११ ते ३१ मार्च, २०१२ | सलग ३ दिवसात रोजी १० मिमि किंवा त्या पेक्षा जास्त पाऊस झाल्यास नुकसान भरपाई रु.५०,०००/- देय होईल.<br>**या विमा संरक्षण प्रकारात कमाल नुकसान भरपाई रु. ५०,०००/- देय** |

**विमा योजनेत सहभाग प्रक्रिया :**

**कर्जदार शेतकरी** : अनिवार्य सहभाग, बँकाकडून डाळींब पिकासाठी कर्ज मर्यादा मंजूर असणाऱ्या सर्व शेतकऱ्यांचा विमा हा त्या त्या बँकाकडून त्यांना देण्यात येणा-या कर्ज पुरवठा रकमेतून भरला जाईल.

**बिगर कर्जदार शेतकरी** : ऐच्छिक सहभाग, सदर शेतकऱ्यांनी प्रस्ताव पत्रक भरुन रोख विमा हप्त्यासह आपले खाते असणाऱ्या बँक शाखेत विहीत मुदतीत जमा करावे.

| | |
|---|---|
| एकूण विमा संरक्षित रक्कम (प्रति हेक्टर) | रु.५०,०००/- |
| शेतकऱ्यांनी भरावयाचा विमा हप्ता (प्रति हेक्टर) | रु.१,५००/- |

*****

## सहपत्र -३
## प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारीत फळपिक विमा योजना २०११-१२

नुकसान भरपाई ठराविण्याची पध्दती:-

१) हवामानावर आधारीत पिकविमा योजनंतर्गत नुकसान भरपाई पूर्णपणे ॲग्रीकल्चर इंश्युरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड शेतकऱ्यास सहपत्र-२ नुसार परस्पर बँकेमार्फत अदा करणार आहे. नुकसान भरपाई देण्याचे कोणतेही दायित्व शासनावर नसेल.

२) नुकसान भरपाई ठरविण्याचा आराखडा मागील २५ वर्षाच्या हवामानाच्या आकडेवारीचा विचार करून निश्चित करण्यात आलेला आहे. त्यानुसार प्रत्येक अधिसूचित फळपिकासाठी प्रमाणके (ट्रिगर) व देय विमा रकमेचा दर निश्चित करण्यात आलेले आहेत. त्यानुसार (सहपत्र २ प्रमाणे) निर्धारीत दराने विमा रक्कम देय होईल.

३) संदर्भ हवामान केंद्र हे त्या तालुक्यामध्ये ॲग्रीकल्चर इंश्युरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड यांनी नोंदणीकृत त्रयस्थ संस्थेमार्फत स्थापित केलेले हवामान केंद्र राहील.

४) देय विमा रक्कम ठरविण्यासाठी ॲग्रीकल्चर इंश्युरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड ही संस्था अधिसूचित तालुक्यातील (सहपत्र-१) फक्त नोंदणीकृत त्रयस्थ संस्थेमार्फत महसूल मंडळ स्थरावर स्थापित केलेल्या संदर्भ हवामान केंद्रामध्ये नोंद झालेल्या आकडेवारीचा वापर करील.

५) जर त्या तालुक्यातील संदर्भ हवामान केंद्रामार्फत काही कारणास्तव आकडेवारी प्राप्त झाली नाही तर त्या कालावधीपुरती पर्यायी हवामान केंद्राची आकडेवारी विचारात घेवून देय विमा रक्कम निश्चित करण्यात येईल.

६) संदर्भ हवामान केंद्रामार्फत प्राप्त आकडेवारी ही ग्राह्य धरण्यात येवून त्यावर आधारीत योजनेच्या तरतुदी नुसार निश्चित करण्यात आलेली विमा रक्कम ही अंतिम राहील.

७) राष्ट्रीय कृषि विमा योजनेनुसार स्थापित राज्यस्तरीय समन्वय समिती, जिल्हास्तरीय तांत्रिक समिती तसेच निर्धारीत वित्तीयसंस्था, राज्यशासन, कृषि विमा कंपनी, कृषि आयुक्तालय यांची निर्धारीत कर्तव्ये व जबाबदाऱ्यांप्रमाणेच हवामान आधारित पीक विमा योजनेसाठी कर्तव्य व जबाबदाऱ्या राहतील,

८) ॲग्रीकल्चर इंश्युरन्स कंपनी ऑफ इंडिया लिमिटेडने तात्काळ योजनेची अंमलबजावणी सुरु करावी व योग्य ती प्रचार प्रसिध्दी करुन योजना प्रभावीपणे कार्यान्वीत होईल हे पहावे.

*********